भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांसाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया महत्वाची ठिकाणे/ स्थळांचा विकास करण्यासाठी निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्र: बैठक-२०१६/ प्र.क्र.४७५/बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० जून, २०१७.

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, सा.न्या.व वि.स.वि. क्र-सान्यावि २०१५/प्र.क्र-१६३/बांधकामे, दिनांक-०९/१०/२०१५
२) शासन निर्णय, सा.न्या.व वि.स.वि. क्र.बैठक-२०१६ /प्र.क्र.४७५/बांधकामे, दि.२४ मार्च, २०१७
३) शासन शुध्दीपत्रक क्र.बैठक-२०१६/प्र.क्र.४७५/बांधकामे, दि.१८ मे, २०१७

**शासन शुध्दीपत्रक** :-

या शुध्दीपत्रकाद्वारे संदर्भ क्र.३ येथे नमूद शासन शुध्दीपत्रक अधिक्रमित करण्यात येत असून संदर्भाधीन क्र.२ येथे नमूद शासन निर्णयात उल्लेखित, दिनांक १६/१२/२०१५ च्या शासन निर्णयात नमूद असलेली "स्वयंसेवी संस्थांना लागू असलेली १० टक्के निधीची अट" संदर्भ क्र-१ येथिल दिनांक ०९/१०/२०१५ च्या शासननिर्णयातील कार्यक्रम भाग-१, अनुक्रमांक-०६ येथे नमुद बाबींना लागू होत नसल्याने, कार्यक्रम भाग-१, अनुक्रमांक-०६ अन्वये प्रस्तावित सर्व कामासाठी सदर अट वगळण्यात येत आहे. त्यानुसार दिनांक २४/३/२०१७ च्या निर्णयामधील २८ स्थळांच्या विकास कामांना सदर अट लागू राहणार नाही.

कार्यक्रम भाग-१,अनुक्रमांक-०६ अन्वये प्रस्तावित सर्व कामांचे अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून अथवा संबंधित क्षेत्रातील शासकीय प्राधिकरणातील सक्षम प्राधिकारी उदा. MMRDA, NIT, MJP, CIDCO, महानगरपालिका किंवा तत्सम प्राधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेतलेले असावे. तसेच खाजगी वास्तुशास्त्रज्ञांनी तयार केलेले नकाशे व अंदाजपत्रके संबंधित कार्यकारी अभियंता/अधीक्षक अभियंता/मुख्य अभियंता यांचेकडून प्रमाणित करुन घ्यावीत.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०७०१११०४०१७४२२ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justic and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d81b5c910bad5837d7f88ac97a75b312f0e5744ecbdc45b7704dcb27f5d4dfef, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2017.07.01 11:01:55 +05'30'

(अ.कों.आहिरे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४) सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
६) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे
८) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण केंद्र, पुणे
९) मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव
१०) मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव
११) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१२) सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४) निवडनस्ती / बांधकामे.